**मौजे तळिये, ता. महाड, जि.रायगड येथे अतिवृष्टीने बाधित झालेल्यांसाठी म्हाडामार्फत नवीन घरकुले बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बैठक-२०२१/प्र.क्र.१२८/गृनिभू**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड येथे २२ व २३ जुलै, २०२१ रोजी अतिवृष्टीने झालेल्या नुकसानीच्या अनुषंगाने दि. २६ जुलै, २०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत अतिवृष्टीमुळे दरड कोसळल्यामुळे मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड आणि त्याच्या आजुबाजूच्या वाडयांचे (कोंडाळकर वाडी, बौध्दवाडी, मधली वाडी, खालची वाडी शिंदे वाडी, कुंभेनळी व चर्मकार वाडी) पुनर्वसन म्हाडामार्फत करण्याचे मा. मंत्री गृहनिर्माण जाहीर केले होते. सदर प्रकरणी मा. मंत्री (गृहनिर्माण) महोदयांच्या अध्यक्षतेखाली यासंदर्भात विविध बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या. सदर बैठकांना मा. ना. श्रीमती अदिती तटकरे, पालकमंत्री रायगड, मा. ना. श्री. विजय वडेट्टीवार, मंत्री (मदत व पुनर्वसन) मा. ना. श्री. भरतशेठ गोगावले वि.स.स., जिल्हाधिकारी, रायगड हे उपस्थित होते. सदर बैठकांमध्ये मौजे-तळिये, ता.महाड, जि.रायगड तळीये व लगतच्या वाडीतील एकूण २६३ कुटुंबांसाठी म्हाडामार्फत म्हाडाच्या निधीतून घरकुले बांधण्याबाबत चर्चा झाली.

त्याअनुषंगाने मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड गावातील ८ वाडीतील २६३ कुटुंबांच्या पुनर्वसनासाठी घरकुल म्हाडाच्या निधीतून म्हाडामार्फत बांधण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड गावातील ८ वाडीतील २६३ कुटुंबांच्या पुनर्वसनासाठी Prefab Steel structure with precast sandwich panel wall system या पद्धतीचे ३००० चौ. फुट जागेवर ६०० चौ. फुट चटई क्षेत्रफळाचे घरकुल म्हाडाच्या निधीतून बांधण्याकरिता खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

(१) मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड गावाच्या पुनर्वसनातील Prefab Steel structure with precast sandwich panel wall system या पद्धतीच्या घरकुलांचे बांधकाम म्हाडा करेल. यासाठी लागणारा घरकुल बांधकाम खर्च म्हाडाच्या निधीतून करण्यात येईल.
(२) सदर निर्णय हा केवळ मौजे-तळिये, ता. महाड, जि.रायगड गावाच्या पुनर्वसनासाठीच लागू राहील. या प्रकरणाचा अन्य कोणत्याही प्रकरणी पूर्वोदाहरण म्हणून विचार करण्यात येऊ नये.
(३) उपरोक्त प्रकरणी घरकुल बांधकामाबाबत कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमिता झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी म्हाडाची राहील.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२३१६५०५८८५०९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MALHARI KAWADE

Digitally signed by AJIT MALHARI KAWADE
DN: CN = AJIT MALHARI KAWADE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = HOUSING DEPARTMENT
Date: 2021.12.23 16:53:32 +05'30'

**( अजित कवडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

४) प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

५) प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन विभाग), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.

७) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) सचिव, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे (पुर्व) मुंबई.

९) मुख्य अधिकारी, कोकण गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई.

१०) निवड नस्ती (गृनिभू कार्यासन) , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.